राज्यातील चारही कृषि विद्यापीठे व संलग्न संस्थामधील कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधी वरील सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील व्याज प्रदानाची रक्कम समायोजित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२२/प्र. क्र.३०/७-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : २५ मार्च, २०२२.**

वाचा :- १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक - अेजीयु-२६९०/प्र.क्र.३९/१८-अे, दिनांक २९/०२/१९९२
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र..अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७.०३.२०२२.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक - अेजीयु - २६९०/प्र.क्र.३९ / १८-अे, दि. २९/०२/१९९२ नुसान विद्यापीठांतर्गत असलेल्या कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीची रक्कम शासनाकडे सुपूर्द करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार राज्यातील चारही कृषि विद्यापीठे व संलग्न संस्थामधील अधिकारी/ कर्मचारी यांच्या दिनांक ०१.०४.२०२१ ते दिनांक ३१.०३.२०२२ या कालावधीत जमा होणा-या रक्कमेवरील व्याज प्रदानासाठी सन २०२१-२२ च्या सुधारीत अंदाजपत्रकात रु.१३,९९,८०,०००/- (रुपये तेरा कोटी नव्याण्णव लाख ऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यांत आली आहे. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कृषि विद्यापीठे व संलग्न संस्थामधील अधिकारी / कर्मचारी यांच्या सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षातील भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदानासाठी सुधारित अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार रु.१३,९९,८०,०००/- (रुपये तेरा कोटी नव्याण्णव लाख ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयाव्दारे महालेखापाल, मुंबई / नागपूर, महाराष्ट्र यांचेकडे पुस्तकी समायोजनाव्दारे (Book Adjustment) सुपूर्द करण्यांत येत आहे.

| अ.क्र. | विद्यापीठाचे नांव | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी | २,६४,६६,००० |
| २. | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली | २,०३,७५,००० |
| ३. | डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | ७,९०,१९,००० |
| ४. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | १,४१,२०,००० |
| | **एकूण** | **१३,९९,८०,०००/-** |

२. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, रत्नागिरी, अकोला व परभणी यांनी उपरोक्त व्याजाच्या रकमेचे समायोजन करुन अभिलेखाकित करण्याची व नोंद घेण्याची कार्यवाही करण्यांत यावी.

३. कृषि विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेतील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदानासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.१३,९९,८०,०००/- (रुपये तेरा कोटी नव्याण्णव लाख ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

मागणी क्रमांक - डी - १
“२०४९, व्याज प्रदाने
०३ अल्पबचत, भविष्य निर्वाह निधी इत्यादींवरील व्याज
१०४, राज्य भविष्यनिर्वाह निधींवरील व्याज (००)
(००)(०१) कृषि विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेतील कर्मचा-यांचा सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी (अनिवार्य) (२०४९ १२१२) ४५, व्याज” (भारित)

४. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १६२ (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७.०३.२०२२ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३२५१६५७२५२१०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.03.25 16:58:33 +05'30'

**(वर्षा मेहेर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
**प्रत,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर,
४. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली, जि.रत्नागिरी,
५. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जि.अकोला,
६. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, जि.परभणी,
७. महालेखापाल (स्थानिक लेखा परीक्षा व लेखा), महाराष्ट्र, मुंबई,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/ रत्नागिरी /अकोला/ परभणी,
९. उपकोषागार अधिकारी, राहुरी, जि.अहमदनगर/ दापोली, जि.रत्नागिरी/ अकोला/ परभणी,
१०. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर/दापोली/अकोला/परभणी,
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१५. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१६. वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-२/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१७. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे/६अे/ पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१८. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.